**नवी मुंबई महानगरपालिकेच्या महासभेने पारित केलेल्या ठराव क्र.१२०६, दि.२६.०८.२०१६ मधील उपसूचना निलंबित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः- नमुंम-१२१६/प्र.क्र.११४/१६/नवि-२८**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांकः- ०७ जानेवारी, २०१७

वाचा - १) नवी मुंबई महानगरपालिका महासभा ठराव क्र.१२०६, दि.२६/०८/२०१६.
२) आयुक्त, नवी मुंबई महानगरपालिका यांचे पत्र क्र.नमुंमपा/घकव्य/कार्या-३/१२६८/२०१६, दि.०७.१०.२०१६.

**प्रस्तावनाः-**

नवी मुंबई महानगरपालिका प्रशासनाने पालिकेच्या नुतन मुख्यालयातील हाऊस किपींगच्या कामांबाबत महानगरपालिकेच्या महासभेसमोर सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने नवी मुंबई महानगरपालिकेच्या महासभेने दि.२६/०८/२०१६ रोजी पुढीलप्रमाणे ठराव क्र.१२०६ पारित केलाः-

"नवी मुंबई महानगरपालिकेच्या नुतन मुख्यालयातील हाऊस किपींगची कंत्राटी कामे Area Basis वर करण्याकरीता बृहन्मुंबई बांधकाम विभागाची दरसुची सन २०१६-२०१७ व यापुर्वी प्रस्तावात नमूद दरानुसार असून, प्रस्तावात नमूद करण्यात आलेल्या बाबींसह, अंदाजकीय खर्च रक्कम रु.९९ लाख, ८३ हजार, ३०४ मात्र x ३ वर्ष = रक्कम रु.२ कोटी, ९९ लाख, ४९ हजार, ९१२ मात्र इतक्या खर्चास, सुधारीत प्रशासकीय मंजुरी देण्यास आणि यासाठी गेल्या २ वर्षापासून कार्यरत ७० कामगार आहेत तसेच ठेवण्यास आणि सदर कामगारांना किमान वेतन कायद्यानुसार वेतन आणि वेतनाचा फरक पुर्वलक्षी प्रभावाने अदा करण्यास सुचविल्याप्रमाणे उपसुचनेसह मंजुरी देण्यात यावी."

**०२.** उपरोल्लेखित ठरावातील उपसूचनेमधील "गेल्या २ वर्षापासून कार्यरत ७० कामगार आहेत तसेच ठेवण्यास आणि सदर कामगारांना किमान वेतन कायद्यानुसार वेतन आणि वेतनाचा फरक पुर्वलक्षी प्रभावाने अदा करणे" हा भाग विखंडीत करण्याची विनंती आयुक्त, नवी मुंबई महानगरपालिका यांनी उपरोल्लेखित वाचा-२ येथील पत्रान्वये केली आहे. सदर उपसूचना प्रशासकीय दृष्ट्या संयुक्तिक नसल्याने, तसेच सदर उपसूचनेची अंमलबजावणी करण्यात आल्यास ते महानगरपालिकेच्या आर्थिक हिताच्या विरोधात ठरणार असल्याने उक्त उपसूचना महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ४५१ (१) अनुसार निलंबित करण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

नवी मुंबई महानगरपालिकेच्या महासभेने पारित केलेल्या ठराव क्र.१२०६, दि.२६/०८/२०१६ मधील "गेल्या २ वर्षापासून कार्यरत ७० कामगार आहेत तसेच ठेवण्यास आणि सदर कामगारांना किमान वेतन कायद्यानुसार वेतन आणि वेतनाचा फरक पुर्वलक्षी प्रभावाने अदा करणे" ही उपसूचना प्रस्तावनेत नमूद करण्यात आलेल्या पार्श्वभूमीवर महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ४५१ (१) नुसार निलंबित करण्यात येत आहे. याबाबत संबंधितांना काही अभिवेदन करावयाचे असल्यास त्यांनी ३० दिवसांत शासनास सादर करावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१७०१०७१२४२४४४५२५ असा आहे. हा निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Jayasingrao N Patil

Digitally signed by Jayasingrao N Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Jayasingrao N Patil
Date: 2017.01.07 12:45:11 +05'30'

**( ज. ना. पाटील )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२) महापौर, नवी मुंबई महानगरपालिका, जिल्हा ठाणे.
३) आयुक्त, नवी मुंबई महानगरपालिका, जिल्हा ठाणे.
४) सचिव (नवि-२) यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.
५) निवडनस्ती (नवि-२८).